केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत कार्यक्रमांसाठी अनुसूचीत जाती उपयोजनेंतर्गत सन २०१६-१७ मधील केंद्र हिश्श्यापोटी रू.६१९१.०० लक्ष अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः PHD ३००११/७९६/२०१६/आ-७**

१० वा मजला , गो. ते. रूग्णालय संकूल इमारत

नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१

दिनांक: २६ ऑक्टोबर, २०१६.

**वाचा**

१) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७-३४/२०१६-NHM(Finance)/१, दिनांक २१ सप्टेंबर, २०१६ चे पत्र.(३३७०.००लक्ष)

२) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७-३४/२०१६-NHM(Finance)/२, दिनांक २१ सप्टेंबर, २०१६ चे पत्र. (२८२.०० लक्ष)

३) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७-३४/२०१६-NHM(Finance)/१, दिनांक २१ सप्टेंबर, २०१६ चे पत्र. (२५३९.०० लक्ष)

४) आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांचे क्र.राआसोम/एफएमजी/ कें.हि./५५१०४-११०/२०१६-१७, दिनांक १३ ऑक्टोंबर, २०१६ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण जनतेस सहजसाध्य, परवडण्याजोगी, कार्यक्षम, उत्तरायी आणि विश्वासार्ह, सर्व गरजू प्रकारच्या आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरु केले. सन २०१४-१५ मध्ये केंद्र शासनाने आरोग्य विषयक सर्व केंद्र पुरस्कृत योजना एकत्रित करुन त्यास "राष्ट्रीय आरोग्य अभियान" असे नाव दिले. या राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत आता राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान व राष्ट्रीय रोग नियंत्रण कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत योजनांचा समावेश केला आहे. राष्ट्रीय आरोग्य अभियानातील राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेकरीता अनुसूचीत जाती उप योजनेंतर्गत सन २०१६-१७ साठी केंद्र शासनाने ६०% हिस्सा पहिला हफ्ता वितरीत केला

असून सदर अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय :-

राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत कार्यान्वित असलेल्या केंद्र पुरस्कृत योजना व कार्यक्रम याकरीता अनुसूचीत जाती उप योजनेंतर्गत (SCSP) सन २०१६-१७ साठी ६०% केंद्र हिश्श्यापोटी रु. ६१९१.०० लक्ष पुढीलप्रमाणे वितरीत करण्यात येत आहे.

**केंद्र हिस्सा** (रू. लाखात)

| अ.क्र. | NRHM अंतर्गत कार्यक्रम | मंजूर अनुदान |
|---|---|---|
| 1. | RCH Flexible Pool | 3005.00 |
| 2. | Routine Immunization (RI) | 138.00 |
| 3. | Pulse Polio Immunization (PPI) | 227.00 |
| 4. | Health System Strengthening under NRHM | 282.00 |
| 5. | Health System Strengthening under NRHM | 2539.00 |
| | एकूण | **6191.00** |

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सहसंचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, पुणे यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील केंद्र हिश्श्याचा खर्च मागणी क्र.आर-१, २२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य; ०६, सार्वजनिक आरोग्य; ७८९- अनुसूचीत जाती विशेष घटक योजना (०१) अनुसूचीत जाती उप योजनेंतर्गत योजना; (०१) (०३) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान केंद्र पुरस्कृत योजना (केंद्र हिस्सा) (२२१०F४८९) - ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१६-१७ साठी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

५. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग दिनांक ३० ऑक्टोबर, २०१५ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३४७/अर्थोपाय, दिनांक २४ ऑक्टोंबर, २०१६ अन्वये प्राप्त सहमतीने आणि वित्त विभागाच्या दिनांक ६ ऑक्टोबर, २०१५ च्या परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१०२५१८०२०४३२१७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Tanbaji Uike

Digitally signed by Ashok Tanbaji Uike
DN: CN = Ashok Tanbaji Uike, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2016.10.26 17:24:11 +05'30'

(अ. ता. उईके)
**महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव**

प्रत,

१. महालेखापाल( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अति. संचालक, कु.क. कार्यालय, पूणे
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणॆ .
७. सहाय्यक संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
८. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई .

११.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. वित्त विभाग ( अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१३.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१४.निवडनस्ती ( आरोग्य -७) .